महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-१११९/ प्र.क्र.६५/ पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: २३ सप्टेंबर, २०२१

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः ईएसटी-२००९/ प्र.क्र.१५६/पापु-२३, दिनांक २७/०८/२००९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः मजीप्रा-२०१४/ प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३/०३/२०१७
३) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर-२०१९/प्र.क्र.०१/सेवा-९/दिनांक ३०/०१/२०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९/दिनांक २०/०२/२०१९
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर-२०१९/प्र.क्र.१५/सेवा-९/दिनांक १४/०५/२०१९
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९/दिनांक ३०/०५/२०१९

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या सातव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारित वेतन संरचनेच्या धर्तीवर राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन अधिसूचनेअन्वये दिनांक ०१/०१/२०१६ पासून सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारित वेतन संरचना मंजूर करण्यात आली आहे.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्राप्त होत असलेले ई.टी.पी. शुल्क वारंवार कमी होत असल्याने प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तिवेतन यावरील खर्च कसा भागवावा हा गंभीर प्रश्न महाराष्ट्र जीवन प्राधिकरणापुढे निर्माण झाला होता. त्यामुळे संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या नियमित वेतन व भत्यांचे दायित्व तसेच सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी यांच्या निवृत्तिवेतनाचे दायित्व राज्य शासनामार्फत स्वीकारण्यात आलेले आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचाऱ्यांना संदर्भाधीन (१) च्या शासन निर्णयान्वये सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणीप्रमाणे वेतन व भत्ते अदा करण्यात येत आहेत. राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना मंजूर करण्यात आलेली आहे. मात्र महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचाऱ्यांच्या वेतन/भत्त्यांचे दायित्व शासनाने २३ मार्च, २०१७ पासून स्वीकारले असल्यामुळे एप्रिल, २०१७ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारित वेतन संरचना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ मधील कलम ६६(२)(ब) अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांना दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे सुधारित वेतन संरचना मंजूर करण्यात येत आहे. पुढील महिन्याच्या १ तारखेपासून (१ ऑक्टोबर, २०२१ पासून) या सुधारित वेतनश्रेणीप्रमाणे संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांना वेतन अदा करावे.

२. संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक ३० जानेवारी, २०१९, संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९, संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १४ मे, २०१९ आणि संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ३० मे, २०१९ मधील तरतूदींनुसार तसेच वित्त विभागाकडून वेळोवेळी दिलेल्या सूचनांप्रमाणे सुधारित वेतन संरचनेतील वेतननिश्चिती आणि त्यानुषंगाने दिनांक १.०४.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०२१ पर्यंतच्या अनुज्ञेय थकबाकीची परिगणना करावी.

३. दिनांक १.०४.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०२१ पर्यंतच्या अनुज्ञेय थकबाकीच्या अनुषंगाने सर्व कर्मचाऱ्यांचे सुधारित वेतन परिगणीत केल्यानंतर प्रत्यक्ष परिगणनेप्रमाणे अनुज्ञेय थकबाकीच्या रकमेची मागणी प्राधिकरणाने शासनाकडे स्वतंत्ररित्या करावी. प्रत्येक वर्षी थकबाकीच्या

प्रयोजनासाठी शासनाकडून निधी प्राप्त झाल्यानंतरच थकबाकीच्या रकमा प्राधिकरणाने विहित पद्धतीने प्रदान कराव्यात.

४. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्यास मान्यता दिली असल्याने, खालील तरतूदीचे पालन करणे प्राधिकरणावर बंधनकारक राहील :-

अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण स्वतःच्या उत्पन्न वाढीच्या उपाययोजना आखेल व प्राधिकरण पूर्ण कार्यक्षमतेने कार्यरत राहण्यासाठी अंतर्गत सुधारणा करेल.

ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या पाणी पुरवठा योजनांचा पूर्ण आढावा घेण्यात येईल व या योजना पूर्ण कार्यक्षमतेने चालविण्याची प्राधिकरण व्यवस्था करेल. तसेच ज्या योजनेसाठी कर्मचाऱ्यांची आवश्यकता भासेल तेथे अस्तित्वात असलेल्या कर्मचाऱ्यांमधून नियुक्ती करण्यात येईल. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या आस्थापनेकडे असलेल्या सर्व कार्यालयांचा आढावा घेऊन ज्या ठिकाणी पुरेसा कार्यभार नाही, अशी कार्यालये बंद करण्याची कार्यवाही प्राधिकरण करेल.

क) प्राधिकरणातील उपलब्ध अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवांचा पर्याप्त वापर होईल, अशा रितीने अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा/पदे शासन मान्यतेने समायोजित करण्यात याव्यात.

ड) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे स्थानिक स्वराज्य संस्था व इतर थकबाकीदार यांच्याकडून येणे असलेली वसुली महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम १९७६ च्या तरतूदीनुसार प्रभावीपणे करेल.

इ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचारी यांना त्यांच्या दर्जानुसार क्षेत्रीय, तांत्रिक व कार्यालयीन कामकाजांचे प्रशिक्षण देऊन कार्यालयीन कामकाजांचा दर्जा वाढविणे, प्रत्येकांची कर्तव्य व जबाबदाऱ्या याबाबत दृढसंकल्प व बांधिलकी राहील.

५. नियमित आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्यासंदर्भात सदरील प्रयोजनासाठीचा खर्च "मागणी क्रमांक -वाय २- २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१- पाणी पुरवठा, ००१-संचालन व प्रशासन, (०१) आस्थापना, (०१)(०२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान,

दत्तमत (२२१५A०४१), ३६- सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत खर्ची टाकून तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २२०/२०२१/सेवा-९, दिनांक १३.०८.२०२१ व अनौपचारीक संदर्भ क्र. १०३/२१/सेवा-४, दिनांक ३०.०८.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२३११०००५४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, serialNumber=d90328c2fc4e73b881bcfea3bc5824fa462a2ec1e4ead4bfe3b4979112bdb493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2021.09.23 11:27:42 +05'30'

( रा. म. गेंगजे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
३. मा. अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव
४. मा. सभापती / उपसभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा. विधानसभा / विधानपरिषद विरोधी पक्ष नेता
७. सर्व मा. विधानमंडळ सदस्य, विधान भवन, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व सर्व प्रादेशिक विभाग प्रमुख
१०. प्रबंधक उच्च न्यायालय (मुळ शाखा) मुंबई
११. प्रबंधक, उच्च न्यायालय अपील शाखा, मुंबई
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१५. आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई
१६. सचिव, राज्य निवडणूक प्राधिकरण, मुंबई

१७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/ नागपूर/ औरंगाबाद
१९. सर्व विभागीय आयुक्त,
२०. सर्व जिल्हाधिकारी
२१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२४. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
२५. महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र मुंबई
२६. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई
२७. महालेखापाल-२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र नागपूर
२८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र नागपूर
२९. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक नवी दिल्ली
३०. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
३१. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
३२. मुख्य लेखापरीक्षक स्थानिक निधी हिशोब, मुंबई
३३. उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
३४. निवासी लेखापरीक्षक, मुंबई
३५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३६. लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/ नागपूर/ पुणे/ औरंगाबाद
३७. मुख्याधिकारी सर्व नगरपालिका
३८. बहुजन समाज पार्टी, बी-१ इन्साहटमेंट आझाद मैदान, मुंबई-१
३९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सीडीओ बॅरेक क्रमांक-१ योगक्षेम समोर वसंतराव भागवत चौक नरिमन पॉईट मुंबई-२०
४०. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी,३१४ राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-०४
४१. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
४२. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर मुंबई २५
४३. नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईट मुंबई-२१
४४. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई -२८

४५. पाणी पुरवठा विभागातील सर्व कार्यासने
४६. सेवा-४, सेवा-९, साउ, व्यय-३, अर्थसंकल्प-१८ कार्यासने, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४७. निवड नस्ती (कार्यासन पापु-२३)

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१११९/प्र.क्र.६५/पापु-२३,दिनांक २३ सप्टेंबर, २०२१ सोबतचे परिशिष्ट)

| अ. क्र. | संवर्ग | ६ व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी | | ७ व्या वेतन आयोगातील सुधारित वेतनश्रेणी सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर/ (Pay Level in Revised Pay Matrix) |
|---|---|---|---|---|
| | | वेतनबॅन्ड (Pay Band) | ग्रेडवेतन (Grade Pay) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सदस्य सचिव (प्रशासन) | **पीबी-४.** ३७४००-६७००० | १०००० | S-**३०**:१४४२००-२१८२०० |
| २ | मुख्य अभियंता | **पीबी-४.** ३७४००-६७००० | ८९०० | S-**२९**:१३११००-२१६६०० |
| ३ | संचालक (वित्त) | **पीबी-४.**३७४००-६७००० | ८९०० | S-**२९**:१३११००-२१६६०० |
| ४ | मुख्य प्रशासकीय अधिकारी | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ७६०० | S-**२५**:७८८००-२०९२०० |
| ५ | उप मुख्य लेखाधिकारी | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ७६०० | S-**२५**:७८८००-२०९२०० |
| ६ | अधीक्षक अभियंता (स्थापत्य/यांत्रिकी) | **पीबी-३.** १५६००-३९१००<br>**पीबी-४.**३७४००-६७००० (२० टक्के पदांसाठी निवडश्रेणी) | ७६००<br>८७०० | S-**२५**:७८८००-२०९२००<br>S-**२७**:११८५००-२१४१००<br>(२० टक्के पदांसाठी निवडश्रेणी) |
| ७ | आस्थापना अधिकारी (दक्षता) | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ६६०० | S-**२३**:६७७००-२०८७०० |
| ८ | कार्यकारी अभियंता (स्थापत्य) | **पीबी-३.**१५६००-३९१०० | ६६०० | S-**२३**:६७७००-२०८७०० |
| ९ | कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) | **पीबी-३.**१५६००-३९१०० | ६६०० | S-**२३**:६७७००-२०८७०० |
| १० | प्रशासकीय नि आस्थापना अधिकारी | **पीबी-२.**९३००-३४८०० | ५४०० | S-**२०**:५६१००-१७७५०० |
| ११ | वरिष्ठ लेखाधिकारी | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ५४०० | S-**२०**:५६१००-१७७५०० |
| १२ | अंतर्गत लेखा परीक्षा अधिकारी | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ५४०० | S-**२०**:५६१००-१७७५०० |
| १३ | कायदा व कामगार अधिकारी | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४६०० | S-**१६**:४४९००-१४२४०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १४ | कक्ष अधिकारी/विशेष अधीक्षक | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४४०० | **S-१५:**४१८००-१३२३०० |
| १५ | लेखा अधिकारी | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४४०० | **S-१५:**४१८००-१३२३०० |
| १६ | उप अभियंता/सहायक कार्यकारी अभियंता/ सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य/यांत्रिकी) | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ५४०० | **S-२०:**५६१००-१७७५०० |
| १७ | उपविभागीय अधिकारी (उप अभियंता, स्था./यां.) | **पीबी-३.** १५६००-३९१०० | ५४०० | **S-२०:**५६१००-१७७५०० |
| १८ | उच्च श्रेणी लघुलेखक | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४४०० | **S-१५:**४१८००-१३२३०० |
| १९ | सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य/यांत्रिकी) | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४४०० | **S-१५:**४१८००-१३२३०० |
| २० | अधीक्षक/कार्यासन अधिकारी | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४३०० | **S-१४:**३८६००-१२२८०० |
| २१ | भांडार अधीक्षक | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४३०० | **S-१४:**३८६००-१२२८०० |
| २२ | सहा.लेखाधिकारी (मुख्य लेखापाल) | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४३०० | **S-१४:**३८६००-१२२८०० |
| २३ | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य/यांत्रिकी) | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४३००<br>४४०० (विहीत कालावधीच्या सेवेनंतर) | **S-१४:**३८६००-१२२८००<br>S-१५:४१८००-१३२३००<br>(विहीत कालावधीच्या सेवेनंतर) |
| २४ | विभागीय लेखापाल | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| २५ | वीज पर्यवेक्षक | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| २६ | प्रथम लिपिक | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| २७ | लघुलेखक निम्नश्रेणी | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४३०० | **S-१४:३८६००-१२२८००** |
| २८ | उप लेखापाल | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| २९ | भांडारपाल | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| ३० | उभारक (इरेक्टर) | **पीबी-२.** ९३००-३४८०० | ४२०० | **S-१३:**३५४००-११२४०० |
| ३१ | गाळणी निरिक्षक | **पीबी-१.**५२००-२०२०० | २८०० | **S-१०:**२९२००-९२३०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३२ | आरेखक | **पीबी-१.**५२००-२०२००<br>**पीबी-२.**९३००-३४८००<br>(४वर्षांच्या अर्हताकारी सेवेनंतर.) | २८००<br>४३०० | S-**१०:**२९२००-९२३००<br>S-**१४:**३८६००-१२२८०० (४ वर्षांच्या अर्हताकारी सेवेनंतर.) |
| ३३ | सहाय्यक आरेखक | **पीबी-१.**५२००-२०२००<br>**पीबी-२.** ९३००-३४८००<br>(५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २४००<br>४२०० | S-८: २५५००-८११००<br>S-**१३:**३५४००-११२४००<br>(५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) |
| ३४ | वरिष्ठ लिपिक | **पीबी-१.**५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ३५ | पाणी पट्टी अधीक्षक | **पीबी-१.**५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ३६ | स्थापत्य अभि.सहाय्यक | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ३७ | वीजतंत्री | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ३८ | पाळी अभियंता | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ३९ | प्रमुख मीटर दुरुस्तीकार | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २४०० | S-८: २५५००-८११०० |
| ४० | अनुरेखक | **पीबी-१.** ५२००-२०२००<br>**पीबी-१.** ५२००-२०२००<br>(७ वर्षानंतर) | २०००<br>२४०० | S-**७:**२१७००-६९१००<br>S-८: २५५००-८११००<br>(७ वर्षानंतर) |
| ४१ | यांत्रिकी | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २००० | S-**७:**२१७००-६९१०० |
| ४२ | प्रयोगशाळा सहाय्यक | **पीबी-१.** ५२००-२०२०० | २००० | S-**७:**२१७००-६९१०० |
| ४३ | लिपिक-नि-टंकलेखक/ कनिष्ठ लिपिक | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४४ | सहाय्यक भांडारपाल | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४५ | मीटरवाचक | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४६ | मिस्त्री | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४७ | वाहनचालक | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४८ | पंपचालक (पंप ऑपरेटर) | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ४९ | जोडारी | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ५० | मीटर दुरुस्तीकार | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |
| ५१ | गवंडी | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-**६:**१९९००-६३२०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५२ | तारतंत्री | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-६:१९९००-६३२०० |
| ५३ | लाईनमन | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-६:१९९००-६३२०० |
| ५४ | पाणी पटटी वसूलीकार | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १९०० | S-६:१९९००-६३२०० |
| ५५ | बांधणीकार | **पीबी-१.** ५२००-२०२०० | १८०० | S-५:१८०००-५६९०० |
| ५६ | तेलवाला | १S. ४४४०-७४४० | १६०० | S-३:१६६००-५२४०० |
| ५७ | दफ्तरी | १S. ४४४०-७४४० | १६०० | S-३:१६६००-५२४०० |
| ५८ | नाईक | १S. ४४४०-७४४० | १६०० | S-३:१६६००-५२४०० |
| ५९ | लोहमुद्रक नि चक्रमुद्रक यंत्रचालक (फेरोप्रिंटर) | १S. ४४४०-७४४० | १६०० | S-३:१६६००-५२४०० |
| ६० | माळी | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६१ | शिपाई | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६२ | चौकीदार | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६३ | हमाल | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६४ | मदतनीस | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६५ | मजूर | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६६ | चावीवाला/व्हॉल्वमन | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६७ | सफाईगार | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६८ | स्वच्छक | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| ६९ | खलाशी | १S. ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |